**मौजे सातगांव म्हसला ता.जि.बुलडाणा या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः क्र. सुप्रभा २११३/प्र.क्र.१८६/पापु १३**
**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मुंबई-४०० ०३२**
**तारीख: १७ जलै,२०१५**

**वाचा -**

१) ग्रामपंचायत सातगांव म्हसला ग्रामसभा ठराव क्र.२, दि.०२/०४/२०११
२) अधिक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष, अमरावती यांचे पत्र क्र. भानिक/अम/तांशा/तां.मं./७९/२०१३,दि.३०/०३/२०१३
३) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद बुलडाणा यांचे पत्र क्र.बुजिप/ग्रापापुवि/तांशा/४७४/२०१३,दि.२२/०४/२०१३
४) शासन निर्णय ग्रापाधो-१११११/प्र.क्र.१३४/पापु-०७,दि.२०/०२/२०१५

**प्रस्तावना -**

मौजे सातगांव म्हसला.ता.व जि.बुलडाणा या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.७४.१८ लक्ष (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.**१** येथील ग्रामसभा ठरावाद्वारा प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापी योजनेच्या खर्चात काही अपरिहार्य कारणामुळे वाढ झाली. त्यामुळे अधिक्षक अभियंता**,** विभागीय भारत निर्माण कक्ष, अमरावती यांनी प्रस्तुत योजनेस संदर्भाधिन पत्र क्र.२ अन्वये सुधारीत तांत्रिक मान्यता दिली. यास्तव प्रस्तुत योजनेचा **रु.१३९.९२ लक्ष (ढोबळ)** किंमतीच्या नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद बुलडाणा यांनी संदर्भाधिन पत्र क्र. ३ अन्वये शासनास सादर केला होता. विभागाच्या संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये जिल्हा परिषदेकडील पाणी पुरवठा योजनांसाठी प्रशासकीय कामासाठी ९% ऐवजी ४% खर्च अनुज्ञेय ठेवण्यात आला आहे.यास्तव मौजे सातगांव म्हसळा.ता.व जि.बुलडाणा या नळ पाणी पुरवठा योजनेच्या निव्वळ वाढीव रकमेवर ९% ऐवजी ४% प्रशासकीय खर्च धरुन आराखडयास व अदांजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय -

मौजे सातगांव म्हसला.ता.व जि.बुलडाणा या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.१२२.०१ लक्ष (ढोबळ) (अक्षरी रुपये एक कोटी बावीस लक्ष एक हजार फक्त) एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास** पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. जिल्हा परिषद, बुलढाणा यांनी प्रस्तुत योजनेच्या सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या सादर केलेल्या प्रस्तावातील वाढीव वितरण व्यवस्थेवरील रु.१६.४४ लक्ष खर्च वगळण्यात यावा. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे ६ महिन्यात पूर्ण करावीत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद बुलडाणा यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी ,योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor

maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारित करण्यात येऊ नये.

८. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

२. या योजनेवर सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु.४७.८२ लक्ष (अक्षरी रुपये सत्तेचाळीस लक्ष ब्याऐंशी हजार फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत जिल्हा परिषद बुलडाणा यांना उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

**३. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११७/११४३, दिनांक १३/०५/२०१५ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ २८६/व्यय-३,दि.२८/०५/२०१५ अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.**

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१७१०२६१५१५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Deoram Ambekar

Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: CN = Suresh Deoram Ambekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.07.17 10:38:32 +05'30'

**( सु.दे.आंबेकर)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
३) जिल्हाधिकारी, बुलडाणा.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा
५) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती
६) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अमरावती
७) वरिष्ट भुवैज्ञानिक भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, बुलडाणा.

११) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.

१२) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई.

१३) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग,बुलडाणा

१४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलडाणा

१५) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१६) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१७) सर्व कार्यासने, पा. पु. व स्व. वि.मंत्रालय,मुंबई-३२.

२०) निवडनस्ती कार्यासन पापु-१३.